**मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांचे न्यायालयीन आदेशानुसार रक्कम न्यायालयात जमा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीआरटी-०५१५/प्र.क्र.३०३/पोल-१३**

गृह विभाग, मंत्रालय,
मुख्य इमारत, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २४ सप्टेंबर, २०१५

वाचा :-

**मा.उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ येथे दाखल क्रिमीनल रिट पिटीशन क्रमांक ३४२/२०१५ या याचिकेवर सुनावणी दरम्यान मा. न्यायालयाने दिनांक १४ सप्टेंबर, २०१५ रोजी दिलेले आदेश.**

प्रस्तावना :-

पोलीस स्टेशन सिताबर्डी गु.र.क्र.११२/१२, भा.दं.वि. कलम ४०६, ४०८, ४०९, ४२०, ४६५, ४६८, ४७१, २०१, १९२, १९६, १२०(ब) मधील सचिन अशोक खरे, रा. लक्ष्मीनगर, नागपूर यांची रु.१५,०५,०००/-, लॅपटॉप, डेस्कटॉप व इतर कागदपत्रे जप्त करुन दिनांक २७/०३/२०१२ रोजी तपासी अमलदार यांनी पोलीस स्टेशन, सदर, नागपूर येथील मालखान्यात माल क्र.२३/१२, दिनांक २८/०३/२०१२ रोजी जमा केली होती. परंतु सदर रक्कम स्वत:चा आर्थिक फायदा करुन घेण्यासाठी त्या रक्कमेचा अपहार केल्याचे निष्पन्न झाले होते. सदर रक्कम सचिन अशोक खरे यांना न मिळाल्यामुळे त्यांनी जप्त केलेली मालमत्ता परत मिळणेबाबत प्रथम न्याय दंडाधिकारी वर्ग-१, कोर्ट नं.२ नागपूर येथे अर्ज केला होता. सदर न्यायालयाने सचिन अशोक खरे यांचा अर्ज फेटाळल्यामुळे त्यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर येथे अपील दाखल केले आहे. सदर अपिलाच्या सुनावणीच्या वेळी पोलीस आयुक्त, नागपूर यांनी रु.१५,०५,०००/- न्यायालयात जमा करण्याबाबत आदेश दिले आहेत.

**शासन निर्णय:-**

सदर न्यायालयीन प्रकरणातील न्यायालयीन आदेशानुसार पोलीस आयुक्त, नागपूर यांना न्यायालयात रु.१५,०५,०००/- जमा करण्यासाठी शासन मान्यता देत आहे. सदर

रक्कम अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आहरण व संवितरण अधिकारी, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी सदर रक्कम पोलीस आयुक्त, नागपूर यांना अदा करावी. यासाठी होणारा खर्च (००)१०९ जिल्हा पोलीस (००)(००)(०१) जिल्हा पोलीस बल भारीत (२०५५०१५९), ५० इतर खर्च (भारीत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो चालू वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात यावा.

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग चार, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३६/२०१३/विनियम-भाग २, दिनांक १७/०४/२०१५ सुधारणा मधील अनुक्रमांक १ (५) नुसार मंजुरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०९२४१२००५६४०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: CN = Suresh Mahadeo Khade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.09.24 13:41:59 +05'30'

**( सुरेश खाडे)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. अधिदान लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर,
३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
४. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
६. पोलीस आयुक्त, नागपूर,
७. गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती, पोल-१३.